५

२०१४०८१४१५३०५११५२३

**ब्रम्हपूरी , जिल्हा चंद्रपूर येथील पर्यटन, कला व सांस्कृतिक महोत्सवासाठी जिल्हाधिकारी, चंद्रपूर यांना सन २०११-१२ या आर्थिक वर्षात प्रसिध्दी करिता सहायक अनुदान मंजूर करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग,**
**शासन निर्णय, क्रमांक टिडीएस २०१२ /३ / प्र.क्र.५५/पर्यटन,**
**मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.**
**दिनांक :२९ मार्च, २०१२**

**संदर्भ :- जिल्हाधिकारी, चंद्रपूर यांचे पत्र क्र. निवि /का-१५/ सांस.१ / प.क्र.११/सांपमो /२०११-१२ / २७०, दिनांक ६ मार्च, २०१२.**

**शासन निर्णय :**

महाराष्ट्र राज्यातील पर्यटन स्थळांची राष्ट्रीय व आंतरराष्ट्रीय स्तरावर प्रसिध्दी व त्याच्या विकासास उत्तेजन देणे, निरनिराळे पर्यटन महोत्सव साजरे करणे यासाठी सन २०११-१२ मध्ये रु २५.०० कोटी इतक्या रकमेची तरतूद अर्थसंकल्पित करण्यात आली आहे.अर्थसंकल्पित तरतूदीतून महाराष्ट्र पर्यटन विकास महामंडळास रु. १०.०० कोटी तरतूद वितरीत करण्यात आली आहे. सदर तरतूदीमधून चंद्रपूर जिल्ह्यातील पर्यटनास चालना मिळण्याच्या दृष्टीने ब्रम्हपूरी, जिल्हा चंद्रपूर येथे पर्यटन, कला व सांस्कृतिक महोत्सव, २०११-१२ साजरा करण्यासाठी जिल्हाधिकारी, चंद्रपूर यांना सन २०११-१२ या आर्थिक वर्षात **रुपये ५.०० लाख (अक्षरी रुपये : पाच लाख फक्त)** इतका निधी वितरीत करण्यास या शासन निर्णयान्वये मंजूरी देण्यात येत आहे.

२. चंद्रपूर जिल्ह्यात सन २०११-१२ मध्ये ब्रम्हपूरी येथे पर्यटन, कला व सांस्कृतिक महोत्सव साजरा करण्यासाठी रुपये ५.०० लाख (रुपये : पाच लाख फक्त) इतका निधी महाराष्ट्र पर्यटन विकास महामंडळास वितरीत केलेल्या रुपये १०.०० कोटी इतक्या निधीतून जिल्हाधिकारी , चंद्रपूर यांना महामंडळाने खालील अटी व शर्तीच्या अधिन राहून अदा करण्यास या शासन निर्णयाद्वारे मान्यता देत आहे.

**अटी व शर्ती :**

अ) प्रसिध्दी करिता महाराष्ट्र पर्यटन विकास महामंडळास मंजूर करण्यात आलेल्या निधीतून जिल्हाधिकारी , चंद्रपूर यांना महोत्सवासाठी मंजूर निधी वितरीत करावा व जिल्हाधिकारी , चंद्रपूर यांनी महोत्सवाचे आयोजन करुन महोत्सव साजरा करावा.

ब) ज्या संदर्भात निधी उपलब्ध करुन देण्यात येत आहे त्या प्रत्येक योजनेच्या संदर्भात वित्तिय अधिकाराच्या प्रत्यावर्तनानुसार सक्षम प्रशासकीय व वित्तिय मान्यता घेणे आवश्यक आहे.

क) वितरीत केलेल्या निधीतून खर्च करताना वित्तीय नियमांचे आणि विविध नियमांतर्गत नेमून दिलेल्या कार्यपध्दतीचे पालन करण्यात यावे.

ड) कोणत्याही परिस्थितीत मंजूर अनुदानापेक्षा जास्त खर्च होणार नाही याबाबतची सर्व जबाबदारी जिल्हाधिकारी यांची राहिल व जादा खर्चाची प्रतिपुर्ती शासनाकडून केली जाणार नाही.

इ) अशा प्रत्येक योजनेबाबत करावयाच्या बांधकामासंदर्भात अथवा खरेदीबाबत किंवा सेवा पुरवठा कराराबाबत वित्तीय नियमांप्रमाणे आवश्यक ती कार्यपध्दती पाळणे आवश्यक आहे. या संदर्भात शासन परिपत्रक, वित्त

विभाग, क्रमांक-संकीर्ण-१००२/प्र.क्र.१५/कोषा-प्र५, दि. ६ फेब्रुवारी, २००२ च्या सूचनांचे काटेकोरपणे पालन होईल याची खबरदारी संबंधित अंमलबजावणी यंत्रणेने घ्यावी. तसेच शासन निर्णय वित्त विभाग क्र.बीजीटी-१०.००/प्र.क्र.५६/२०००/वित्तीय सुधारणा दिनांक १०.९.२००१ मधील उपाययोजनांची अंमलबजावणी तंतोतंतपणे.करण्यात.यावी.

फ) सदर रक्कमेच्या खर्चाचा महालेखापाल कार्यालयाशी ताळमेळ घालून अहवाल शासनास सादर करावा.

**३. यासाठी होणारा खर्च मागणी क्रमांक झेड्डी - ४, "३४५२-पर्यटन', ०१-पर्यटनासाठी पायाभूत सुविधा, १०१-पर्यटन केंद्रे (०१) पंचवार्षिक योजनांतर्गत योजनाराज्य योजनांतर्गत योजना (०२) (०४) प्रसिध्दी (३४५२ १९३ १) ३१ सहायक अनुदान या लेखाशीर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा व तो सन २०११-१२ या आर्थिक वर्षातील अर्थसंकल्पित तरतूदीतून भागविण्यात यावा.**

४. या आदेशान्वये मंजूर करण्यात आलेली सहायक अनुदानाची रक्कम महाराष्ट्र पर्यटन विकास महामंडळास प्रसिध्दी या लेखाशिर्षाखाली सन २०११-१२ मध्ये वितरीत केलेल्या रुपये १०.०० कोटी रक्कमेतून महाराष्ट्र पर्यटन विकास महामंडळाने जिल्हाधिकारी , चंद्रपूर यांना रुपये ५.०० लाख महोत्सवासाठी उपलब्ध करुन द्यावी.

५. हा शासन निर्णय वित्तीय अधिकार नियम पुस्तिका, १९७८ भाग पहिला, उपविभाग-पाच, शासन निर्णय क्र. विअप्र १०.०८/प्र.क्र.७०/२००८, दि.१५ मे २००९ मधील अनु. क्र. ३ नियम क्र. १३४ अन्वये प्रशासकीय विभागांना प्रदान केलेल्या अधिकारातंर्गत निर्गमित करण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने.

आ.बा.डमाळे

**(आ. बा. डमाळे)**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

महालेखापाल, महाराष्ट्र - १, (लेखा परिक्षा/लेखा व अनुज्ञेयता), मुंबई .
महालेखापाल, महाराष्ट्र - २, (लेखा परिक्षा/लेखा व अनुज्ञेयता), नागपूर
व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र पर्यटन विकास महामंडळ, मुंबई
जिल्हाधिकारी, चंद्रपूर
जिल्हा कोषागार अधिकारी, चंद्रपूर
अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई
निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई
नियोजन विभाग (कार्यासन-१४११/१४४४), मंत्रालय, मुंबई
वित्त विभाग (का.व्यय-१४/अर्थोपाय) मंत्रालय, मुंबई
पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग, सां. का-३, मंत्रालय, मुंबई
निवड नस्ती, कार्यासन-पर्यटन.